**मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या मा. न्यायमूर्तींच्या युनिट स्टाफमधील पदांची संख्या ९ वरून १३ इतकी वाढविणेबाबत.**

## महाराष्ट्र शासन

**विधि व न्याय विभाग**

**शासन निर्णय, क्र. :- पदनि-५९१४/६५५/(८४)/का.चार**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- ०४डिसेंबर, २०१८.

**संदर्भ** :- १) प्रबंधक (पर्सोनेल), अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे क्र. RC १६१२/७२ (LRU-१२ UNIT)/Part-II/१७६/२०१५, दि. १४/०१/२०१५.

२) शासन निर्णय, समक्रमांक, दि. १७/०५/२०१६ व शुद्धिपत्रक, दि. ८/०६/२०१६.

३) प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई यांचे क्र. P&E/३२१/२०१६, दि. ३१/०५/२०१६.

४) महाप्रबंधक, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. RG/१६११/३६/२०१६, दि. १/०६/२०१६.

५) शासन निर्णय, समक्रमांक, दि. १५/०७/२०१७ व शुद्धिपत्रक, दि. २/१२/२०१७.

६) प्र. प्रबंधक (मूळ शाखा) तथा प्रोथोनोटरी ॲँड सिनियर मास्टर, उच्च न्यायालय, मुंबई यांचे पत्र क्र. P&E/९३/२०१८, दि. १/०२/२०१८.

**प्रस्तावना :-**

मा. मुंबई उच्च न्यायालयाच्या प्रत्येक न्यायमूर्तींच्या युनिट स्टाफमधील मंजूर पदांची संख्या ९ इतकी होती. उच्च न्यायालयाच्या मा. न्यायमूर्तींच्या न्यायिक व प्रशासकीय कामकाजात मागील काही वर्षात झालेली प्रचंड वाढ विचारात घेऊन यासंदर्भात पूर्वी उच्च न्यायालयाने मा. न्या. श्री. दाभोळकर व मा. न्या. श्री. मार्लापल्ले यांची समिती नेमली होती. या समितीने युनिट स्टाफमधील पदांची संख्या ९ वरुन १३ इतकी वाढविण्याची आवश्यकता प्रतिपादित केली होती. त्यानुसार मुंबई उच्च न्यायालयाच्या मुख्यपीठ तसेच नागपूर, औरंगाबाद व पणजी (गोवा) खंडपीठाच्या आस्थापनेवरील मा. न्यायमुर्तींच्या प्रत्येक युनिट साठी १ स्वीय सहायक, १ लिपिक व २ शिपाई याप्रमाणे मा. न्यायमुर्तींची तात्कालीन मंजूर पदसंख्या (७५) अधिक रजा राखीव युनिट (१२) याप्रमाणे मा. न्यायमुर्तींच्या ८७ युनिटसाठी एकूण ३४८ पदांच्या निर्मितीचा प्रस्ताव शासनाच्या मान्यतेसाठी सादर केला होता.

उच्च न्यायालयाचा सदर प्रस्ताव उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेसाठी सादर करण्यात आला असता समितीने मा. न्यायमुर्तींच्या ८७ युनिटसाठी प्रतियुनिट १ स्वीय सहायक व १ लिपिक याप्रमाणे एकूण १७४ पदे नियमित स्वरूपात निर्माण करण्यास तर प्रतियुनिट २ शिपाई याप्रमाणे १७४ पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे करण्यास मान्यता प्रदान केली . त्यानुसार शासन निर्णय, दि. १७/०५/२०१६ निर्गमित करण्यात आला. सदर पदांमध्ये उच्च न्यायालयाच्या मूळ शाखेच्या आस्थापनेवरील पदांचा समावेश करण्याच्या अनुषंगाने संबंधित शासन निर्णयात दि. ८/०६/२०१६ रोजी शुद्धिपत्रक निर्गमित करण्यात आले. तसेच मा. न्यायमुर्तींच्या युनिट स्टाफमधील शिपाई संवर्गातील पदांच्या कामाचे स्वरूप विचारात घेऊन या पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे न करता ही पदे उच्च न्यायालयाच्या आस्थापनेवर नियमित स्वरूपात निर्माण करण्याची फेरविनंती उच्च न्यायालयाने केली होती. त्यानुसार मा. न्यायमुर्तींच्या युनिट स्टाफमधील शिपाई संवर्गातील १७४ पदांची कामे बाह्ययंत्रणेद्वारे न करता सदर पदे मुंबई उच्च न्यायालयाच्या आस्थापनेवर नियमित स्वरूपात निर्माण करण्यास शासन निर्णय, दि. १५/०७/२०१७ अन्वये मान्यता प्रदान करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामध्ये उच्च न्यायालयाच्या खंडपीठनिहाय पदांचे विवरण दर्शविण्याच्या अनुषंगाने दि. २/१२/२०१७ रोजी शुद्धिपत्रक निर्गमित करण्यात आले आहे.

उक्त शासन निर्णय तसेच यानुषंगाने निर्गमित करण्यात आलेली शुद्धिपत्रके यांमध्ये सुटसुटीतपणा आणण्याकरिता शासन निर्णय, दि. १७/०५/२०१६, शुद्धिपत्रक, दि. ८/०६/२०१६ तसेच शासन निर्णय, दि. १५/०७/२०१७ व शुद्धिपत्रक, दि. २/१२/२०१, त्याअन्वये निर्माण करण्यात आलेल्या पदांच्या निर्मितीस बाधा न आणता, अधिक्रमित करून एकत्रित सुधारित शासन निर्णय निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संदर्भ क्र. २ येथील शासन निर्णय, दि. १७/०५/२०१६ व शुद्धिपत्रक, दि. ८/०६/२०१६ आणि तसेच संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णय, दि. १५/०७/२०१७ व शुद्धिपत्रक, दि. २/१२/२०१७, त्याअन्वये निर्माण करण्यात आलेल्या पदांच्या निर्मितीस बाधा न आणता, सदर शासन निर्णयान्वये अधिक्रमित करण्यात येत आहेत.

२. मा. उच्च न्यायालय, मुंबई येथील मूळ शाखा, अपील शाखा तसेच नागपूर, औरंगाबाद व पणजी (गोवा) खंडपीठ यांच्या आस्थापनेवरील मा. न्यायमुर्तींच्या रजा राखीव युनिटसह एकूण ८७ युनिटसाठी प्रतियुनिट १ स्वीय सहायक, १ लिपिक व २ शिपाई अशा एकूण ३४८पदांच्या निर्मितीस तसेच त्यांच्या वेतन व भत्ते यानुषंगाने येणाऱ्या खालील तक्त्यात दर्शविलेल्या आवर्ती खर्चास सदर शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. सदर ३४८ पदांचा तपशील पुढीलप्रमाणे आहे.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | पदसंख्या | मासिक खर्च | वार्षिक खर्च |
|---|---|---|---|---|---|
| १. | स्वीय सहायक | रु. १५६००-३९१०० + ग्रेड पे रु. ५४०० | ८७ | रु. ४४,३७,०००/- ( रु. ५१००० X ८७ ) | रु. ५,३२,४४,०००/- |
| २. | लिपिक | रु. ५२००-२०२०० + ग्रेड पे रु. १९०० | ८७ | रु. १५,९८,९७३/- (रु. १८३७९ X ८७) | रु. १,९१,८७,६७६/- |
| ३. | शिपाई | रु. ४४४०-७४४० + ग्रेड पे रु. १३०० | १७४ ( प्रति युनिट २ याप्रमाणे ) | रु. २३,८८,४९८/- (रु. १३,७२७ X १७४) | रु. २,८६,६१,९७६/- |
| **४.** | **एकूण** | | **३४८** | **रु. ८४,२४,४७१/-** | **रु. १०,१०,९३,६५२/-** |

३. सदर मा. न्यायमुर्तींच्या ८७ युनिटपैकी ४ युनिट हे मुंबई उच्च न्यायालयाच्या पणजी (गोवा) खंडपीठाच्या आस्थापनेवरील आहेत. त्यानुषंगाने सदर४ युनिटसाठी प्रतीयुनिट १ स्वीय सहायक, १ लिपिक व २ शिपाई याप्रमाणे एकूण १६ पदे ही गोवा खंडपीठाच्या आस्थापनेवर निर्माण करावयाची आहेत. याकरिता येणाऱ्या आवर्ती खर्चाचा भार हा गोवा राज्य शासनावर राहील. मुंबई उच्च न्यायालयाच्या मा. न्यायमुर्तींच्या सदर ८७ युनिट स्टाफचे खंडपीठ निहाय वितरण पुढीलप्रमाणे आहे.

| | **उच्च न्यायालय, मुंबई, मुख्यपीठ** | | **नागपूर खंडपीठ** | **औरंगाबाद खंडपीठ** | **पणजी (गोवा) खंडपीठ** | **एकूण** |
|---|---|---|---|---|---|---|
| | **मूळ शाखा** | **अपील शाखा** | | | | |
| **मा. न्यायमुर्तींची संख्या** | १० | २७ | १६ | १८ | ०४ | **७५** |
| **रजा राखीव युनिट** | ०१ | ०७ | ०२ | ०२ | -- | **१२** |
| **एकूण** | **११** | **३४** | **१८** | **२०** | **०४** | **८७** |

४. सदर शासन निर्णय स्वीय सहायक व लिपिक या संवर्गातील पदांकरिता दि. १७/०५/२०१६ या तारखेपासून तर शिपाई संवर्गातील पदांकरिता दि. १५/०७/२०१७ या तारखेपासून पूर्वलक्षी प्रभावाने लागू राहील.

५. नवीन पदनिर्मितीमुळे होणारा आवर्ती खर्च हा मूळ शाखेवरील ४४ पदांकरिता "मागणी क्र. जे-१, २०१४ न्यायदान (००), १०२ उच्च न्यायालये, (अनिवार्य) (०२) (०१) प्रबंधक, मूळ न्यायशाखा (२०१४ ००७४) ०१ वेतन" या लेखाशिर्षाखाली तर अपील शाखेवरील २८८ पदांकरिता "मागणी क्र. जे-१, २०१४ न्यायदान (००), १०२ उच्च न्यायालये, (अनिवार्य) (०३) (०१) प्रबंधक, अपील शाखा (२०१४ ००९२) ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा व या लेखाशीर्षाखालील त्या त्या वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

६. प्रस्तुत शासन निर्णय हा उच्चस्तर सचिव समितीच्या मान्यतेने तसेच वित्त विभागाकडील अनौपचारिक संदर्भ क्र. ३५१/आपुक, दि. १०/०७/२०१७ अन्वये त्या विभागाच्या सहमतीने तथा सक्षम प्राधिकाऱ्यांच्या मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१८१२०४१५३२५७६०१२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.**

Sanjeev R Keluskar

Digitally signed by Sanjeev R Keluskar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Law and Judiciary Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4a521517a0d3fba83ff4473cb0d448a75f9b7f83cba41836833b60c93758c804, cn=Sanjeev R Keluskar
Date: 2018.12.04 15:40:06 +05'30'

**(संजीव केळूसकर)**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, विधानभवन, मुंबई.
२. मा. मुख्य सचिव तथा अध्यक्ष, उच्चस्तर सचिव समिती यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई.
३. महाप्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई.
४. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
५. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई.
६. प्रबंधक (प्रशासन), उच्च न्यायालय, मुंबई, खंडपीठ नागपूर/औरंगाबाद/पणजी (गोवा).

७. महालेखापाल (लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-एक, मुंबई.
८. महालेखापाल(लेखापरीक्षा/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-दोन, नागपूर.
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
१०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
११.जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर/औरंगाबाद.
१२.वित्त विभाग, व्यय-६/अर्थ ११/वित्तीय सुधारणा, मंत्रालय, मुंबई.
१३.कार्यासन अधिकारी, का. २३/२५, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४.निवड नस्ती.